**मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांच्या कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील पदांना दिनांक ०१/०३/२०१७ ते दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१७/(२३१/२०१७)/मोप्र-(२),**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : ०१/०६/२०१७

**पहावे:-** १) शासन निर्णय क्रमांक मुदतवाढ-२०१६/(६७५/२०१६)/मोप्र-(२), दिनांक ३०.०१.२०१७.

२) मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर यांचे जावक पत्र क्रमांक ६६/मुअगोप्र/आलि-२/२०१७, दिनांक.०६.०१.२०१७ चे पत्र.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १०/०२/२०१७.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० संदर्भाधीन क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.१०.२०१६ ते २८.०२.२०१७ पर्यंत चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आली होती. संदर्भ क्रमांक ३ चे वित्त विभागाचे शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यावर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना ते दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले आहेत.

**शासन निर्णय:-**

आता संदर्भीय क्रमांक २ च्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्यानुसार उपरोक्त कार्यालयातील नियत अस्थायी आस्थापनेवरील ३० पदांना दिनांक ०१/०३/२०१७ ते दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत खालील अटींचे अधिन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

१) उपरोक्त सर्व पदे विभागाने प्रस्तावित केलेल्या कालावधीत कार्यरत असतील.

२) ही पदे आकृतीबंधानुसार मंजूर असतील व सहा महिन्याहून अधिक कालावधीसाठी रिक्त नसतील.

यावर होणारा खर्च मागणी क्रमांक आय-५(नियत अस्थाई आस्थापना), मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधा-यावरील भांडवली खर्च (८०), सर्वसाधारण १९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर

उपक्रमांतील गुतंवणूका, (०४) योजनेतर-वेतनावरील खर्चासाठी भाग भांडवली अंशदान (०४)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवपली अंशदान (४७०१ आय १७१) या लेखाशिर्षाखालील खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अनुदानातून भागवावा.

हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/ आ.पु.क., दिनांक १०/०२/२०१७ यानुसार विभागास दिलेल्या प्राधिकारानुसार व आंतरवित्त सल्लागार व उप सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थाळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६०११७४३४५१५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2017.06.01 17:45:50 +05'30'

**(पां. तु. केदारे)**

शासनाचे अवर सचिव

सोबत:- विवरणपत्र

**प्रत:- सहपत्रासह,**

१. वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई,
२. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर,
३. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई / नागपूर.
४. मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
५. मोप्र-(२) संग्रहार्थ.

# विवरणपत्र

## शासन निर्णय क्र. मुदतवाढ-२०१७/(२३१/२०१७) मोप्र-(२), दिनांक ०१/०६/२०१७ चे सहपत्र
## नियत अस्थाई आस्थापनेवरील एकूण ३० पदे (१/३/२०१७ ते ३०/०९/२०१७)

| अ. क्र. | पदनाम | आकृतीबंधानुसार मंजूर पदे | मुदतवाढ द्यावयाची पदे |
|---|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता | १ | १ |
| २ | सहायक मुख्य अभियंता (कार्यकारी अभियंता) | २ | २ |
| ३ | उप अभियंता | ३ | ३ |
| ४ | कनिष्ठ अभियंता/सहा. अभियंता श्रेणी-२/शा. अ. | ३ | ३ |
| ५ | विशेष अधिक्षक | १ | १ |
| ६ | अधिक्षक | १ | १ |
| ७ | मुख्य आरेखक | १ | १ |
| ८ | प्रथम लिपिक | १ | १ |
| ९ | मुख्य दप्तर कारकून | १ | १ |
| १० | वरिष्ठ लिपिक | २ | २ |
| ११ | कनिष्ठ लिपिक | २ | २ |
| १२ | लघु लेखक(उच्च/निम्न श्रेणी) | १ | १ |
| १३ | टंकलेखक | ३ | ३ |
| १४ | दूरध्वनी चालक | १ | १ |
| १५ | वाहनचालक | १ | १ |
| १६ | दप्तरी | १ | १ |
| १७ | नाईक | १ | १ |
| १८ | शिपाई | ३ | ३ |
| १९ | चौकीदार | १ | १ |
| | **एकूण** | **३०** | **३०** |
| | | **एकूण पदे ३०** | |